**गोपनीय**

**भ्रष्टाचार प्रतिबंध अधिनियम १९८८ अंतर्गत अभियोग दाखल करण्यास मंजुरी देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन,**
**सामान्य प्रशासन विभाग,**
**शा. नि. क्रमांक :सीडीआर १०९९/ प्र.क्र.६२/९९ /११अ**
**मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,**
**दिनांक : ०३ एप्रिल, २०००**

**संदर्भ :-**१) शा.नि., सा.प्र.वि.क्र.सीडीआर १०९६/प्र.क्र.१००/९६/११, दि.७.११.१९९७.
२)शा.नि.,सा.प्र.वि.,क्र.सीडीआर१०९६/प्र.क्र.१००/९६/११, दि.२४.१२.१९९७.

**प्रस्तावना :-**

लाचलुचपत प्रतिबंध खात्याकडून लाचलुचपत प्रतिबंध अधिनियम १९८८ खाली अभियोग दाखल करण्यासाठी सक्षम प्राधिका-यांच्या पूर्वमंजुरीकरिता प्राप्त होणा-या प्रस्तावांवर करावयाच्या कार्यवाहीबाबत संदर्भाधीन शासन निर्णयान्वये सूचना देण्यात आल्या आहेत. तथापि, प्रशासकीय विभागांना यासंदर्भात काही अडचणी येत असल्याचे निदर्शनास आले आहे. यास्तव, लाचलुचपत प्रतिबंध खात्याकडून अभियोग दाखल करण्यास मंजुरी देण्यासाठी प्राप्त होणा-या प्रकरणात अनुसरण्यात यावयाच्या कार्यपध्दतीबद्दल असणारी संदिग्धता दूर व्हावी यादृष्टीने सर्वंकष आदेश निर्गमित करण्याची बाब विचाराधीन होती. त्यानुसार यापूर्वीचे सर्व आदेश / परिपत्रके यांचा आढावा घेऊन पुढीलप्रमाणे निर्णय घेण्यात आला आहे.

**शासन निर्णय :-**

भ्रष्टाचार प्रतिबंध अधिनियम १९८८ अंतर्गत लोकसेवकांविरुध्द न्यायालयात अभियोग दाखल करण्यासाठी मंजुरी प्राप्त करण्यासाठी लाचलुचपत प्रतिबंध खात्याकडून प्राप्त प्रकरणी खाली विहित केलेली पध्दत अवलंबण्यात यावी :-

**(१) सक्षम प्राधिकारी**

लाचलुचपत प्रतिबंध अधिनियम १९८८ च्या कलम १९ मध्ये खटल्यासाठी कोणाची पूर्वमंजुरी आवश्यक आहे हे नमूद केले आहे. त्यानुसार ब) राज्याच्या व्यवहाराशी संबंधित सेवेमध्ये असलेल्या व राज्य शासनाच्या मंजुरीशिवाय सेवेतून काढून टाकता न येणा-या व्यक्तीच्या बाबतीत त्या शासनाची क) इतर कोणत्याही व्यक्तीच्या बाबतीत त्याला त्याच्या पदावरुन काढून टाकण्याबाबत सक्षम असलेल्या प्राधिकरणाची पूर्वमंजुरी असल्याशिवाय न्यायालय अपराधाची दखल घेणार नाही. हे लक्षात घेता, अभियोग दाखल करण्यास सक्षम प्राधिकारी पुढीलप्रमाणे असतील :-

| | |
|---|---|
| (१) गट-अ व गट-ब(राजपत्रित) | : मंत्रालय स्तरावर संबंधित प्रशासकीय विभाग |
| (२) गट ब (अराजपत्रित), गट-क व गट-ड | : विभाग प्रमुख /कार्यालय प्रमुख |
| (३) अन्य संस्था (उदा.महामंडळे/ मंडळे/स्थानिक स्वराज्य संस्था) ज्यांना शासनाचे अर्थसहाय्य देण्यात येते. | : संबंधित संस्थांचे अध्यक्ष /संचालक इ. |

एच-555(5000-7-00)-1

## (२) लाचलुचपत प्रतिबंध खात्याने प्रस्ताव सादर करताना अवलंबावयाची कार्यपध्दती.

कालापव्यय टाळण्याच्या दृष्टीने अपचारी अधिकारी /कर्मचा-यांचे सक्षम प्राधिकारी निश्चित कोण आहेत याविषयी लाचलुचपत प्रतिबंध खात्यास माहिती असणे आवश्यक आहे. त्याचप्रमाणे एकाच प्रकरणात एकापेक्षा जास्त प्रशासकीय विभागाचे अधिकारी/कर्मचारी यांचा किंवा काही प्रकरणी गट अ ते ड वर्गाच्या अधिकारी/कर्मचारी यांचा एकत्रित सहभाग असतो. अशा प्रकरणी मंजुरी घेताना येणा-या अडचणी लक्षात घेता पुढीलप्रमाणे कार्यपध्दती अनुसरण्यात यावी :-

अ) (१) एकाच विभागाचे राजपत्रित अधिकारी अपचारी असल्यास एकच प्रस्ताव व मंजुरी आदेश आवश्यक असेल.

(२) एकाच विभागाचे गट-अ ते ड मधील अपचारी असल्यास लाचलुचपत प्रतिबंध खात्याकडून एकत्रित प्रस्ताव व संबंधित प्रशासकीय विभागाकडून एकच मंजुरी आदेश आवश्यक असेल.

(३) वेगवेगळया विभागातील राजपत्रित अधिकारी असल्यास लाचलुचपत प्रतिबंध खात्याकडून विभागवार स्वतंत्र प्रस्ताव व संबंधित विभागाकडून स्वतंत्र मंजुरी आदेश आवश्यक असतील.

(४) वेगवेगळया विभागातील फक्त गट-क व ड चे कर्मचारी असल्यास संबंधित नियुक्ती प्राधिकारीनिहाय प्रस्ताव व मंजुरी आदेश आवश्यक असतील.

ब) (१) राजपत्रित अधिका-यांचे विभागनिहाय तसेच एकाच विभागातील राजपत्रित अधिकारी व अराजपत्रित कर्मचा-यांचे एकत्रित प्रस्ताव लाचलुचपत प्रतिबंध खाते गृह विभागाकडे सादर करेल.

(२) अन्य प्रकरणी संबंधीत नियुक्ती प्राधिकारी निहाय प्रस्ताव लाचलुचपत प्रतिबंध खात्याकडून परस्पर सक्षम प्राधिका-यांकडे पाठविण्यात येतील.

## (३) गृह विभागातील कार्यवाही.

परि.२ (ब) (१) संबंधातील प्रस्ताव लाचलुचपत प्रतिबंध खात्याकडून प्राप्त झाल्यानंतर गृह विभागात त्याची छानणी करण्यात येईल आणि काही त्रुटी आढळल्यास यांचे लाचलुचपत प्रतिबंध खात्याकडून निराकरण करुन घेऊन निष्कर्ष सकृतदर्शनी स्वीकारार्ह वाटल्यास अ.मु.स.(गृह) यांच्या सहमतीनंतर असे प्रस्ताव संबंधित प्रशासकीय विभागांकडे पुढील कार्यवाहीसाठी तीन आठवडयाच्या आत पाठविण्यात येतील.

## (४) प्रशासकीय विभागानी करावयाची कार्यवाही

(अ) न्यायालयीन अभियोग दाखल करण्याच्या प्रकरणी प्रशासकीय विभागांनी सक्षम प्राधिकारी म्हणून निर्णय घेताना शासनाची मंजुरी घेणे अभिप्रेत आहे. गृह विभागाकडून प्रशासकीय विभागात प्रस्ताव प्राप्त झाल्यानंतर संबंधित विभागांनी स्वतंत्रपणे विस्तृत छाननी करुन अभियोग दाखल करण्यास मंजुरी द्यावयाची किंवा नाही याबाबत विधी परामर्शी यांचा सल्ला घेऊन निर्णय घ्यावा.त्यानंतर संबंधित विभागाने ज्यांचे वेतन रु.१०,६५०/- पेक्षा कमी आहे त्यांच्या बाबतीत प्रभारी मंत्र्यांमार्फत मा.उपमुख्यमंत्री यांची मान्यता घ्यावी. जे अधिकारी रु.१०,६५०/- व त्यापेक्षा वरीष्ठ वेतनश्रेणीत वेतन घेतात त्यांच्या बाबतीत त्या विभागाचे प्रभारी मंत्री यांचे मार्फत मा.मुख्यमंत्री यांची मान्यता घ्यावी.

(ब) प्रथम विधी परामर्शी यांच्या सल्ल्याकरिता प्रकरण संदर्भित करणे व अभियोग दाखल करण्याचा निर्णय झाल्यानंतर मंजुरीचा मसुदा तपासण्यासाठी पुन्हा विधी व न्याय विभागास संदर्भ करावा लागल्यामुळे होणारा कालापव्यय टाळण्यासाठी प्रकरण विधी व न्याय विभागाकडे विधी परामर्शी यांच्या सल्ल्यासाठी, संदर्भित करण्याच्या टप्प्यावरच मंजुरी आदेशाचा मसुदा देखील तपासून घेण्यास हरकत नाही.

(क) लाचलुचपत प्रतिबंध खात्याचा प्रस्ताव क्षेत्रीय स्तरावर अमान्य करावयाचा असल्यास क्षेत्रीय अधिका-यांनी असे प्रस्ताव अभियोग दाखल करण्यास त्यांच्या विरोधाची कारणे नमूद करुन संबंधित प्रशासकीय विभागांकडे विभागांच्या सचिवांच्या नावाने पाठवावेत. संबंधित प्रशासकीय विभागाने त्याबाबत वर नमूद पध्दतीनुसार शासन आदेश प्राप्त करुन घेण्याची कार्यवाही तातडीने करावी. अशा प्रकरणी गृह विभागाचे अभिप्राय अथवा सहमतीची आवश्यकता नाही.

(ड) १) जेव्हा एखाद्या प्रकरणामध्ये एकापेक्षा अधिक दर्जाचे अधिकारी व कर्मचारी गुंतले असल्याचा निष्कर्ष लाचलुचपत प्रतिबंध विभागाने काढलेला असतो त्यावेळी त्या प्रकरणात गुंतलेल्या सर्व अधिकारी / कर्मचारी यांना समान न्यायाचे तत्व लागू करावे, म्हणजेच वरिष्ठतम अधिकाऱ्यावर खटला भरण्यास मंजूरी देणाऱ्या सक्षम प्राधिकाऱ्याने तशी मंजूरी दिल्याशिवाय कनिष्ठ अधिकारी / कर्मचारी यांच्यावर कोणतीही कारवाई करण्यात येऊ नये आणि जर वरिष्ठतम अधिकाऱ्यावर खटला भरण्यास सक्षम प्राधिकाऱ्याने अनुमती नाकारली तर त्या प्रकरणातील इतर कनिष्ठ अधिकारी /कर्मचारी यांच्यावर कोणतीही कारवाई करण्यात येऊ नये.

२) एखाद्या प्रकरणी वेगवेगळया विभागातील एकापेक्षा जास्त अधिकारी गुंतलेले असतील तर ज्या विभागाचे जास्त अधिकारी असतील त्या विभागाने त्या प्रकरणी कार्यवाही करावी व चक्रीय पध्दतीने (Circulation method) इतर संबंधित प्रशासकीय विभागाची सहमती घ्यावी. जर वेगवेगळया विभागातील दोन अधिकारी गुंतले असतील अशा प्रकरणी ज्येष्ठतम अधिकाऱ्याच्या विभागाने कार्यवाही करावी.

**(५) <u>प्रस्तावावरील कार्यवाहीचे वेळापत्रक</u>**

लाचलुचपत प्रतिबंध खात्याकडून लाचेचा सापळा किंवा अपसंपदेच्या बहुतांशी प्रकरणी करावयाच्या तपासाच्या दरम्यान फार मोठा कालावधी विचारात घेतला जातो. कागदपत्रे व तपशीलही क्लिष्ट व मोठा असतो.या बाबी विचारात घेता, सक्षम प्राधिका-याने प्रकरण तपासताना लक्षपूर्वक तपासणी (Application of mind)केली किंवा नाही असा संशय घेण्यास न्यायालयास वाव मिळू नये या दृष्टीने छाननीच्या टप्प्यावर पुरेसा कालावधी मिळणे आवश्यक आहे. त्यादृष्टीने पुढीलप्रमाणे वेळापत्रक विहित करण्यात येत आहे:-

(१) लाचलुचपत प्रतिबंध खात्याने सापळा प्रकरणी घटना घडल्यानंतर तीन महिन्यांच्या आत तपासाचा अंतिम अहवाल /अभियोग प्रस्ताव संबंधिताकडे सादर करावा. अन्य प्रकरणी एक वर्षाच्या कालावधीत अहवाल द्यावा.

(२) गृह विभागाने तीन आठवडयात संबंधित मंत्रालयीन विभागांकडे प्रस्ताव पाठवावेत.

(३) प्रशासकीय विभागाने विधी व न्याय विभागाच्या सल्ल्यासह सहा आठवडयात शासनाची अंतिम मंजुरी मिळवावी. एखाद्या प्रकरणात अभियोग दाखल करण्यास विहित कालावधीत मंजुरी देण्यात काही अडचणी असल्यास त्या मुख्य सचिवांमार्फत मा.मुख्यमंत्री यांच्या निदर्शनास आणाव्यात.

(४) क्षेत्रीय स्तरावर गट-क व गट-ड च्या कर्मचा-यांबाबत अभियोग दाखल करण्याबाबतचा निर्णय लाचलुचपत प्रतिबंध खात्याकडून प्रस्ताव प्राप्त झाल्यानंतर दोन आठवडयाच्या आत घ्यावा व त्याप्रमाणे मंजुरी आदेश निर्गमित करावे किंवा अमान्य करावयाचा प्रस्ताव संबंधित मंत्रालयीन विभागाकडे सचिवांच्या नावे पाठवावा.

(५) क्षेत्रीय स्तरावरुन प्राप्त वर्ग-क व वर्ग-ड कर्मचा-यांच्या प्रकरणासंबंधात संबंधित प्रशासकीय विभागाने अहवाल प्राप्त झाल्यानंतर तीन आठवडयाच्या आत योग्य तो निर्णय घेऊन त्याबाबत शासनाचे आदेश प्राप्त करुन घ्यावे.

(६) मंजुरी प्राप्त झाल्यानंतर लाचलुचपत प्रतिबंध खात्याने दोन आठवडयाच्या आत सक्षम न्यायालयात अभियोग दाखल करावा.

(७) वर विहित केलेले वेळापत्रक लक्षात घेता ,

अ) लाचेच्या सापळा प्रकरणी (trap cases) खटला दाखल करण्यासाठी जास्तीत जास्त कालावधी सहा महिने इतका असेल.

ब) लाचेच्या सापळयाव्यतिरिक्त अन्य प्रकरणी (उदा. अपसंपदा इत्यादी)अधिकाधिक कालावधी एक वर्ष ३ महिने इतका असेल.

क) क्षेत्रीय स्तरावर हा कालावधी लाचेच्या सापळा प्रकरणी चार महिने व अन्य प्रकरणी एक वर्ष आणि १ महिना इतका राहील.

ड) जी प्रकरणे प्रलंबित आहेत (कुठल्याही स्तरावर) त्यावर हा शासन निर्णय निर्गमित झालेल्या तारखेपासून पुढील २ महिन्यात अंतिम कार्यवाही करणे आवश्यक राहील. मात्र, सहा महिन्याचा अथवा एक वर्ष तीन महिन्याचा कालावधी त्यानंतर पूर्ण होत असेल तर अशानंतरच्या तारखेपर्यन्त संबधित विभागाने प्रकरणी अंतिम निर्णय घेणे आवश्यक राहील.

वर नमूद केलेल्या विहित कालमर्यादेत सक्षम प्राधिकाऱ्याने कोणताही निर्णय घेतला नाही तर त्या प्रकरणात अपचाऱ्याचे निलंबन विहित केलेला कालावधी संपल्यावर लगेचच्या दुसऱ्या दिवशी संपुष्टात आले असे समजण्यात यावे. तसेच जेथे निलंबन समर्थनीय नसेल अशा प्रकरणी निलंबनाचा कालावधी देखील कर्तव्यकाळ म्हणून गणण्यात यावा. याप्रकारचे आदेश निर्गमित होण्यास प्रशासकीय विलंब झाला तर ते आदेश विहित कालावधी संपल्याच्या दुसऱ्या दिवसापासून अंमलात आल्याचे गृहीत धरण्यात येईल. तसे निलंबन संपुष्टात आणावयाचा आदेशात स्पष्टपणे नमूद केलेले असावे. मात्र अशा विलंबास जबाबदार असणाऱ्या अधिकारी / कर्मचाऱ्यावर शिस्तभंगाची कारवाई करण्यात यावी.

## (६) मंत्रालयीन स्तरावरील समिती व कार्यपध्दती

लाचलुचपत प्रतिबंध खात्याकडून अभियोग दाखल करण्याच्या प्रस्तावावर निर्णय घेण्यासाठी मंत्रालयीन स्तरावर खालीलप्रमाणे समिती गठित करण्यात आली आहे.

| | |
|---|---|
| (१) मुख्य सचिव | अध्यक्ष |
| (२) अपर मुख्य सचिव (गृह) | सदस्य |
| (३) सचिव, विधी व न्याय विभाग (विधी परामर्शी) | सदस्य |
| (४) संबंधित विभागाचे अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव | सदस्य |
| (५) महासंचालक, लाचलुचपत प्रतिबंध खाते | सदस्य |
| (६) अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव (सेवा), सा.प्र.वि. | सदस्य सचिव |

समितीच्या बैठकीस मुख्य सचिवांना कार्यबाहुल्यामुळे उपस्थित रहाणे शक्य नसेल तर सदर बैठक अ.मु.स.(गृह) यांच्या अध्यक्षतेखाली आयोजित करण्यांत येईल.

या समितीची कार्यपध्दती खालीलप्रमाणे आहे :-

(१) ज्या प्रकरणी अभियोग भरण्यास मंजुरी आदेश निर्गमित करण्यास अमर्याद विलंब होत असेल किंवा लाचलुचपत प्रतिबंधक विभाग, गृह विभाग व संबंधित प्रशासकीय विभाग यांच्यात अभियोग दाखल करण्यास मंजुरी देण्याबाबत मतभिन्नता असेल तर अशी प्रकरणे समितीपुढे सादर करण्यात यावी. तसेच अशा प्रकरणी संबंधित विभागाच्या सचिवांनी अभियोग दाखल करण्यास परवानगी देण्याची प्रकरणे समिती समोर सादर करावीत किंवा कसे याबाबतही स्वेच्छाधिकार वापरावे.

(२) अशा प्रकरणी समिती एक आठवडयात निर्णय घेईल.

(३) समितीचा निर्णय प्राप्त झाल्यावर नियुक्ती प्राधिका-याने एक आठवडयाच्या आत शासन मान्यता घेऊन मंजुरी आदेश निर्गमित करावे.

(४) समितीचा निर्णय प्राप्त झाल्यानंतर संबंधित मंत्रालयीन विभागाने परि. ४(अ) प्रमाणे कार्यवाही करावी.

प्रच-555(5000-7-00)-2अ.

**(७) न्यायालयात अभियोग दाखल करण्यास मंजुरी देण्याबरोबरच करावयाची इतर कार्यवाही.**

अ) फौजदारी कार्यवाहीच्या तुलनेत विभागीय चौकशीची कारवाई करण्याबाबत शासन निर्णय क्र.सीडीआर - १०८२/३३६२/६९/११, दिनांक १२ जून, १९८६ अन्वये सूचना देण्यात आल्या आहेत. याच सूचनांचा पुनरुच्चार शासन परिपत्रक क्रमांक:सीडीआर- १०९७/प्र.क्र.४६/९७/११, दिनांक १८ नोव्हेंबर,१९९७ अन्वये करण्यात आला आहे. त्यानुसार अपचारी अधिकारी/कर्मचारी यांच्याविरुध्द न्यायालयात अभियोग दाखल करण्यास मंजूरी देण्याबाबत निर्णय देतानाच संबंधिताविरुध्द विभागीय चौकशीची कारवाई सुरु करण्याबाबतही सक्षम प्राधिका-यांनी विचार करावा. मात्र न्यायालयीन खटल्याचा निर्णय लागेपर्यन्त विभागीय चौकशी संदर्भात करावयाची अंतिम कार्यवाही (दोषमुक्ती किंवा शिक्षा देणे) प्रलंबित ठेवण्यात यावी.

(ब) लाचेचा सापळा प्रकरणी (मानीव निलंबन वगळता) ए.सी.बी.कडून अहवाल प्राप्त झाल्यानंतर अपचारी अधिकारी/कर्मचारी यांना तात्काळ निलंबीत करण्याची कार्यवाही सक्षम प्राधिका-यांनी करावी.

२. क्षेत्रीय स्तरावर व संबंधित प्रशासकीय विभाग तसेच लाचलुचपत प्रतिबंध खात्याकडून वर विहित पध्दतीनुसार व वेळापत्रकानुसार कार्यवाही करण्यात यावी व विलंब टाळण्यात यावा.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

मा. वि. कोकणे,
शासनाच्या सह सचिव

प्रति,
मुख्य सचिव,
राज्यपालांचे सचिव,
मुख्य मंत्री यांचे सचिव,
उपमुख्यमंत्री यांचे सचिव,
शासनाचे सर्व अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव,
सर्व मंत्री व राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव/स्वीय सहाय्यक,
महासंचालक, लाचलुचपत प्रतिबंधक विभाग,
*प्रबंधक, उच्च न्यायालय (मूळ शाखा), मुंबई,
*प्रबंधक, उच्च न्यायालय (अपील शाखा), मुंबई,
*प्रबंधक, लोक आयुक्त व उप लोक आयुक्त यांचे कार्यालय, मुंबई,
*सचिव, महाराष्ट्र विधान सभा सचिवालय, मुंबई,
*सचिव, महाराष्ट्र विधान परिषद सचिवालय, मुंबई,
*सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई,
सर्व मंत्रालयीन विभाग,
मंत्रालयीन विभागांच्या नियंत्रणाखालील सर्व विभाग/कार्यालय प्रमुख,
सा.प्र.वि तील सर्व प्रशासकीय कार्यासने,
निवड नस्ती.

---

एच-555(5000-8-00)-3.